सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता "वनमहोत्सव" (२४०६ ८५५१) लेखाशीर्षांतर्गत नविन बाब प्रस्तावांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांकः सावि-२०२४/प्र.क्र.३४ /फ-११
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २७ मार्च, २०२५

वाचा:-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक सावि-२०२२/प्र.क्र.५८/फ-११, दिनांक २८.०७.२०२३
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि. ०१.०८.२०२४, दि.१६.०८.२०२४, दि.२८.०८.२०२४, दि.०२.०१.२०२५, दि.१४.०२.२०२५, दि.२७.०२.२०२५ व दि.२६.०३.२०२५
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं -२०२३/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७.०३.२०२५
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/पी/यो/नबाप्र/प्र.क्र. १५(भाग -१)/१२६०/२०२४-२५, दि.२६.०३.२०२५

प्रस्तावना :-

"वनमहोत्सव" योजनेसाठी मागणी क्र.सी-०७-२४०६ वनीकरण व वन्यजीवन (११)(३४) वनमहोत्सव (२४०६८५५१) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ करिता रु.२७५०.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| योजनेचे नाव | सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पीत निधी (रु.लक्ष) | | | |
|---|---|---|---|---|
| वनमहोत्सव | ०२- मजूरी | २१- पुरवठा व सामुग्री | २६- जाहिरात व प्रसिध्दी | एकूण |
| | १३४८.०० | १३७५.०० | २७.०० | २७५०.०० |

यापुर्वी वाचा क्रमांक ३ येथील दि.०१.०८.२०२४, दि.१६.०८.२०२४, दि.२८.०८.२०२४, दि.०२.०१.२०२५, दि.१४.०२.२०२५, दि.२७.०२.२०२५ व दि.२६.०३.२०२५ च्या शासन निर्णयाद्वारे अनुक्रमे रु.५४.४८ लक्ष, रु.२९.३३ लक्ष, रु.१५७.०६ लक्ष, रु.२६९.२१ लक्ष, रु.३१.४८ लक्ष, रु.७३.१५ लक्ष व रु.१८८.६४ लक्ष असे एकुण **रु.८०३.३५ लक्ष** इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

०२. वित्त विभागाच्या वाचा क्रमांक ४ येथील दि.१७.०३.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये ०२-मजूरी व २१ -पुरवठा व सामग्री या उद्दिष्टांकरीता १०० % मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि

संनियंत्रण प्रणालीव्दारे (बीम्स) वितरीत केला जाईल. तसेच, इतर उदिष्टाकरिता निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनासह व उपलब्ध निधी खर्च झाल्याची खात्री करून आवश्यकतेनुसार नियोजन विभाग / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/ आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी, अश्या सूचना देण्यात आलेल्या आहेत.

०३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा क्र.५ येथील दि.२६.०३.२०२५ अन्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वनमहोत्सव (२४०६-८५५१) या योजनेंतर्गत **रु.५३.६७ लक्ष** इतक्या रकमेचा नविन बाब प्रस्ताव सादर केला आहे. त्याअनुषंगाने सादर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या वनमहोत्सव (२४०६-८५५१) या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्याचे प्रस्तावित आहे:-

**( रु. लाखात)**

| **अ.क्र.** | **वनवृत्त** | **वनविभाग** | **कामाची बाब** | **बेड संख्या** | **रोपे संख्या** | **०२-मजूरी** | **२१-सा. पु.** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | ठाणे | ठाणे | २० x ३० से.मी. आकाराच्या पिशवीमधील रोपे निर्मिती | - | १.१ | २१.४९ | १३.२ | **३४.६९** |
| | | | १२.५ से.मी. x २५ से.मी. आकाराच्या पिशवीमधील रोपे निर्मिती | - | ०.२५ | २.०२ | १.११ | **३.१३** |
| २. | नागपूर | नागपूर | ठोबंरा रोपवाटिकेमध्ये बांबू बेड निर्मिती | १९४ | १.७५ | ४.५० | ५.४८ | **९.९८** |
| | | वर्धा | १२.५ से.मी. x २५ से.मी. आकाराच्या पिशवीमधील रोपे निर्मिती | - | ०.५० | ३.६४ | २.२३ | **५.८७** |
| **एकूण** | | | | **१९४** | **३.६०** | **३१.६५** | **२२.०२** | **५३.६७** |

उपरोक्त तक्त्यात नमुद केल्यानुसार सन २०२४-२५ आर्थिक वर्षाकरीता नविन बाब प्रस्तावांच्या अनुषंगाने वनमहोत्सव (२४०६-८५५१) या योजनेंतर्गत ०२-मजूरी या उदिष्टाखाली **रु.३१.६५ लक्ष** व २१-साहित्य व पुरवठा या उदिष्टाखाली **रु.२२.०२ लक्ष** असे **एकुण रु.५३.६७ लक्ष** इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी सदर निधी तात्काळ वितरीत करून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा. या योजनेंतर्गत करण्यात आलेल्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्यात आली आहे, याबाबतची दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) हे वर्ष २०२४-२५ मध्ये सदर योजनेंतर्गत वितरीत केलेल्या निधीबाबत उपयोगिता प्रमाणपत्र ७ दिवसांत शासनास सादर करतील. सदर निधी वितरीत करताना करण्यात येत असलेली कामे ही वाचा क्रमांक १ येथील दि. २८.०७.२०२३ मधील तरतुदी, वाचा क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील सुचना, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचना तसेच सक्षम प्राधिकारी यांनी मान्यता दिलेल्या अंदाजपत्रकानुसार तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आल्याची खातरजमा करून निधी वितरणाची कार्यवाही नियंत्रक अधिकारी यांनी करावी. तसेच सदर निधी खर्च करताना सुध्दा शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सुचनांचे पालन करण्याबाबतच्या सुचना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयाकडून संबंधीतांना देण्यात याव्यात.

४. सदर निधी वितरित करण्यापूर्वी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२४-२५ करीता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळती केला नसल्याची खात्री करावी.

५. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या वाचा क्रमांक २ येथील शासन परिपत्रकातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदी व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

६. वन वृत्त/विभाग निहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा/ झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

७. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.सी-०७**

**२४०६, वनीकरण व वन्यजीवन,**

**राज्य योजनेंतर्गत योजना (११)(३४) वनमहोत्सव योजनंतर्गत (राज्य) (२४०६ ८५५१ ).**

**०२- मजूरी , २१- पुरवठा व सामुग्री**

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाचे दि.१७.०३.२०२५ रोजीचे परिपत्रक तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२७१९१०५७६३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

PRATAP RAJENDRA SATPUTE

Digitally signed by PRATAP RAJENDRA SATPUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=46e55cdbf3321ecaa0de879cc768619afcdbda90e6691b3baf2255384355942f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47A54DFAE5D873AD7624C29CACBF61D571ADA2CBEECE334AB2E56A179C9FF19F, cn=PRATAP RAJENDRA SATPUTE
Date: 2025.03.27 19:11:40 +05'30'

**( प्रताप राजेंद्र सातपूते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
७. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
१०. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
११. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१२. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. निवडनस्ती फ-११.